**जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत "जिल्हा नियोजन समितीचे बळकटीकरण" या जिल्हास्तरीय योजनेत सुधारणा करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र:- डिएपी-२०२२/प्र.क्र.३६/का.१४८१**
**मंत्रालय, मुंबई** ४०००३२
दिनांक **०६** एप्रिल, **२०२२**

<u>वाचा</u> - शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. डिएपी-१०१५/प्र.क्र.२१५/का.१४८१, दिनांक १५ फेब्रुवारी, २०१६

**<u>प्रस्तावना</u>**

महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम, १९९८ मधील तरतुदीनुसार राज्यात प्रत्येक जिल्हयात जिल्हा नियोजन समिती गठीत करण्यात आल्या आहेत. सन २००८-०९ पासुन जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) चे कामकाज नियोजन विभागाकडे देण्यात आले आहे. सन २००८-०९ पुर्वी जिल्हा योजनांचे कामकाज संबंधित प्रशासकीय विभागांव्दारे हाताळण्यात येत होते. जिल्हास्तरावर राबविण्यात येणाऱ्या योजनांची यादी दरवर्षी नियोजन विभागाव्दारे निर्गमित करण्यात येते. यामध्ये नियोजन विभागाची "जिल्हा नियोजन समितीचे बळकटीकरण" ही योजना अंतर्भुत आहे. या योजनेच्या अंमलबजावणी बाबत मार्गदर्शक सुचना संदर्भाधीन दिनांक १५ फेब्रुवारी, २०१६ च्या शासन निर्णयान्वये निर्गमीत करण्यात आल्या आहेत. जिल्हा नियोजन समितीच्या कामकाजात जिल्हा नियोजन अधिकारी आणि विभागस्तरावरील उप आयुक्त (नियोजन) यांची महत्वपूर्ण भुमिका असते. नियोजन विभागाकडील दिनांक ६ जानेवारी, २०१० च्या शासन परिपत्रकान्वये उपआयुक्त (नियोजन) यांना विभागातील प्रत्येक जिल्ह्यात किमान दोन दिवस याप्रमाणे किमान दरमहा १० दिवस दौरा करुन विकास कामांची पाहणी करणे आवश्यक आहे. तसेच जिल्हा नियोजन अधिकारी आणि सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी यांनी आपल्या जिल्ह्यात किमान दरमहा प्रत्येकाने पाच दिवस दौरा करुन विकास कामांची पाहणी करणे आवश्यक आहे. याशिवाय जिल्ह्यातील विविध बैठकांसाठी जिल्हा नियोजन अधिकारी यांना प्रवास करावा लागतो. यासाठी जिल्हा नियोजन अधिकारी आणि उपआयुक्त (नियोजन) यांच्या पदासाठी शासनाने वाहने अनुज्ञेय केली आहेत. त्या अनुषंगाने, या अधिकाऱ्यांच्या निर्लेखीत केलेली वाहनांच्या बदल्यात नविन वाहन खरेदी "जिल्हा नियोजन समितीचे बळकटीकरण" या जिल्हास्तरीय योजनेंतर्गत अनुज्ञेय करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती. या संदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

"जिल्हा नियोजन समितीचे बळकटीकरण" या योजनेंतर्गत सध्या अनुज्ञेय असलेल्या बाबीं व्यतिरिक्त खालील बाबींचा समावेश करण्यात येत आहे. सदर बाब वाचा येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्र. (ब) मधील अनुक्रमांक (६) च्या पुढे अंतर्भुत करण्यात येत आहे.

(१) जिल्हा नियोजन अधिकारी यांचेकरिता निर्लेखीत केलेल्या वाहनाच्या बदल्यात नविन वाहन खरेदी करणे,

(२) विभागिय आयुक्त कार्यालयातील उप आयुक्त (नियोजन) यांचेकरिता निर्लेखीत केलेल्या वाहनाच्या बदल्यात नविन वाहन खरेदी करणे.

(३) उप आयुक्त (नियोजन) यांचे कार्यालयाकरिता iPAS प्रणालीच्या माध्यमातून जिल्हा नियोजन समितीच्या कामांचे निरिक्षण करणे तसेच विविध प्रकारची आवश्यकतेनुसार माहिती नोंदविण्यासाठी डाटा एन्ट्री ऑपरेटरर्सची नियुक्ती करणे आणि राज्यस्तरीय बैठकांच्या वेळी खरेदी विषयक विहीत नियमांचे पालन करुन आवश्यक असलेली चहापानाची सोय करणे, तसेच बैठकीच्या प्रयोजनासाठी अन्य अनुषंगिक बाबी.

२. वाहन खरेदी करताना शासनाने विहीत केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा. तसेच शासनाने विहीत केलेल्या आर्थिक मर्यादेचे पालन करण्यात यावे.

३. विभागीय आयुक्त कार्यालयातील उपायुक्त (नियोजन) यांच्या कार्यालयासाठी वाहन खरेदी करणे किंवा डाटा एन्ट्री ऑपरेटर्स नेमणे इ. बाबींसाठी विभागीय मुख्यालय जिल्ह्याकडून निधी उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०४०६१६०५२४३४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANJEEV
HARISHCHANDRA DHURI

Digitally signed by SANJEEV HARISHCHANDRA DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b2040f8afae5b15468c26cd79b1393381092c74fb3501bf565f466dec2136a36, pseudonym=457F70F5FA4DEA10E909A007981CEAF0F1C5A45D, serialNumber=F955EDB9F98089D5B84355354FDE7CA14F577C3C2B384D076E4614388B1F5E7A, cn=SANJEEV HARISHCHANDRA DHURI
Date: 2022.04.06 16:53:48 +05'30'

**(सं. ह. धुरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव ,मंत्रालय ,मुंबई

२. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सह सचिव ,मंत्रालय ,मुंबई
३. मा. राज्यमंत्री, (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन ,मंत्रालय ,मुंबई
५. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
६. विभागीय आयुक्त (सर्व)
७. जिल्हाधिकारी (सर्व)
८. उप आयुक्त (नियोजन) विभागीय आयुक्तांचे कार्यालय (सर्व)
९. जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व)
१०. नियोजन विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव
११. निवड नस्ती, का-१४८१, नियोजन विभाग